जलसंपदा प्रकल्पातून बिगर सिंचन पाणी आरक्षणाच्या प्रस्तावांस मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्रमांक. बिसिंआ-२०१८/(२८१/१८)/सिं.व्य.(धो)
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०५.११.२०१८

संदर्भ: जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१५/(४४/१५)/सिं.व्य (धो), दि.१७/११/२०१६

प्रस्तावना :-

१.० महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण (सुधारणा व पुढे चालू ठेवणे) अधिनियम, २०११ यातील कलम ५ मधील १६(क) नुसार जलसंपत्ती प्रकल्पांमधील पाण्याचे क्षेत्रीय वाटप राज्य मंत्रीमंडळाकडून केले जाईल अशी तरतूद करण्यात आली आहे. संदर्भिय शासन निर्णय क्र.१ अन्वये राज्यातील पाटबंधारे प्रकल्पांचे क्षेत्रिय वाटप राज्य मंत्रीमंडळाने निर्धारित केले आहे. या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. २.३ मधील तरतुदीनुसार पिण्याच्या व औद्योगिक पाणी वापराच्या आरक्षण प्रस्तावांना मान्यता देण्याचे अधिकार मा.मंत्रीमंडळ उपसमितीला देण्यात आले आहेत. या अनुषंगाने शासनास प्राप्त झालेल्या खालील प्रस्तावांना मंजुरी देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

शासन निर्णय :-

२.० मा.मंत्रीमंडळ उपसमितीच्या सदस्यांमध्ये चक्राकार पध्दतीने नस्तीवर घेतलेल्या निर्णयानुसार खालील तक्त्यातील रकाना क्र.२ मध्ये नमुद संस्थेला त्यांचे नावासमोर रकाना क्र.४ मध्ये नमूद पाणी आरक्षणास, परिच्छेद ३.० मधी अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पाणी आरक्षणाची मागणी करणाऱ्या संस्थेचे नांव | पाणी मागणीचा प्रकार | मंजूर केलेले पाणी आरक्षण (दलघमी) | जलाशय/कालवा/ नदीचे नांव |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | नॉलेज सिटी एज्युकेशन प्रा.लि.व ऑक्यफर्ड गोल्फ ॲन्ड रिसॉर्टस प्रा.लि.लवळे, ता.मुळशी, जि.पुणे | पिण्यासाठी | ३.०८१ | मुळा नदी |
| २. | बेबॅको डेव्हलपर्स जि. मौजे लोहगाव ता.हवेली जि.पुणे | पिण्यासाठी | २.४६ | वडिवळे मध्यम प्रकल्प/इंद्रायणी नदी |
| ३ | संजीवनी इटीग्रेटेड टाऊनशिप एल एल पी मो उर्से व आढे, ता.मावळ, जि.पुणे | पिण्यासाठी | १.४४ | पवना नदी |

३.० उपरोक्त नमूद प्रस्तावांना खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात आली आहे.

१. सदर पाणी आरक्षण मंजुरी मुळे होणाऱ्या सिंचन कपातीपोटी सिंचन पुन:र्स्थापनेचा खर्च शासन परिपत्रक क्र. संकिर्ण-२००८/ (१३१/०८)/ सिंव्य (धोरण), दि.०६.०३.२००९ नुसार

रु.१ लक्ष प्रति हेक्टर प्रमाणे (Base Year २००९) आधिक भाववाढ निर्देशांक (Cost Inflation Index) विचारात घेऊन येणारी रक्कम अथवा प्रत्यक्ष करारनामा करतेवेळी लागू असलेला शासनाचा प्रचलित दर यापैकी जो जास्त असेल त्या दराने सिंचन पुन:र्स्थापनेचा खर्च करारनामा करणेपुर्वी संस्थेकडून घेण्यात यावा.

२. बिगर सिंचन पाणी पूरवठ्यासाठी करारनाम्याचा सुधारीत नमुना व मार्गदर्शक सूचना महाराष्ट्र शासन पाटबंधारे विभाग शासन परिपत्रक क्र. बिपापू -१०००/ (७१३/२००१)/ सिंव्य धोरण, मुंबई ३२, दि.११.०६.२००३ व दि.०७.०४.२००३ अन्वये निर्गमित केल्या आहेत. त्यानुसार करारनामा करण्यात यावा.

३. जलस्रोत प्रदुषित करण्या-या पाणी वापरत्याकडून दंडनीय पाणीपटटी आकारणी करणेबाबत मार्गदर्शक तत्वे या विषयाबाबत शासन निर्णय क्र. पापव २०१५/ (प्र.क्र.८८/ २०१५)/सिं.व्य.(महसूल), दि २१.४.२०१६ मधील अटींचे पालन करणे पाणी वापरकर्त्यांना बंधनकारक राहील.

४. महाराष्ट्र शासन जलसंपदा विभाग शासन निर्णय क्र.संकिर्ण-२०१०/(४०७/१०)सिंव्य (धोरण), दि.२९.०६.२०११ अन्वये करारनामा करताना बिगरसिंचन पाणीवापर कर्ते अंतिम पाणी मागणीप्रमाणे टप्पाटप्याने पाणीवापर करण्याचे नियोजन नमुद करू शकतील.

५. घरगुती पाणी वापरास कायमस्वरुपी परवाना देण्यास यावा. औद्योगिक संस्थामध्ये काळाच्या ओघात मोठया प्रमाणात बदल होत असतात .त्यांची मालकी ,उत्पादन प्रकारातील बदल ,विस्तारीकरण इ.मुळे त्यांचे सर्वसाधारण पाणी आरक्षणाकरिता परवान्यांची मुदत २५ वर्षासाठी करून त्यानंतर आवश्यकतेप्रमाणे त्यांचे नुतनीकरण करण्यात यावे.

६. घरगुती, औद्योगिक व कृषी-सिंचन प्रयोजनार्थ वापरल्या जाणा-या पाण्यासाठी ठोक जलदराबाबत महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण यांच्या क्र .मजनिप्रा-२०१७/ प्रशुल्क/ठो.ज.द.२०१७-०८/३९ दिनांक १९.१.२०१८ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

७. महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाचे आदेश क्र.मजनिप्रा/२०१७/मसुदा निकष/ हक्कदारी/४११, दिनांक २२.९.२०१७ --अन्वये घरगुती व औद्योगिक प्रवर्गाकरिता ठोक जल हकदारीचे निकष निश्चित केले आहेत. त्या निकषांची पुर्तता संस्थेसोबत करारनामा करणेपूर्वी करण्यात यावी.

८. पाणी उचलण्याची /पुरवठयाची जागा व क्षेत्रिय परिस्थितीनूसार इतर अटी शर्तींचा अंतर्भाव करून संबंधीत मुख्य अभियंता यांनी सविस्तर ज्ञापन तात्काळ निर्गमित करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१८११०६१२१३५०५७२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Atul Ashok Kapole

Digitally signed by Atul Ashok Kapole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=797fcfe0bb4a86dd814129f50d05c1d249ea6f0acc364c6214f11ff7174bd5ef, serialNumber=ae2c4f4c985d3e984de94324901263d48766ec651dea49d652faf11a96aa98b5,
cn=Atul Ashok Kapole
Date: 2018.11.06 12:20:56 +05'30'

**(अ.अ.कपोले)**
शासनाचे उप सचिव

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव.
३. मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
४. मा. सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
५. मा. विराधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
६. मा. विराधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
७. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव.
८. सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
९. सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.
१०. प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग, मुंबई.
१३. मुख्य अभियंता (पा) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे
१५. अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे
१६ निवडनस्ती कार्यासन सिंव्य (धोरण).